स्वातंत्र्य सैनिक/त्यांची नामनिर्देशित व्यक्ती ह्यांना शासन सेवेत नेमणुकीसाठी दिलेल्या सवलतींनुसार नेमणुका देण्याबाबत कार्यवाही तत्परतेने करण्यासंबंधात.

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक: सीएनएस-1092/3647/प्र.क्र.77/16-अ,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 18 जानेवारी, 1993.

पहा : 1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-सीएनएस-1090/3497/सीआर-74/90/16-अ, दिनांक 22 जानेवारी, 1991.

2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-1087/499/प्र.क्र.-12/16-अ, दिनांक 4 मार्च, 1991.

शासन परिपत्रक :-- स्वातंत्र्य सैनिक/त्यांची नामनिर्देशित व्यक्ती ह्यांना शासकीय सेवेत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील वर्ग 3 च्या पदावर तसेच वर्ग4 मधील पदावर नियुक्ती संबंधात शासनाने वेळोवळी निर्गमित केलेल्या आदेशांचे एकत्रन करुन वर उल्लेखिलेल्या दिनांक 4 मार्च 1991 च्या शासन परिपत्रकान्वये त्यांचा पुनरुच्चार केलेला आहे. तसेच स्वातंत्र्य सैनिक/नामनिर्देशित व्यक्ती ह्यांच्याकडून नेमणुकीसंबंधात प्राप्त झालेल्या अर्जावर नियमानुसार तत्परतेने कार्यवाही व्हावी, ह्या दृष्टीने शासनाने संबंधित आदेश अधिपत्याखालील विविध विभाग व कार्यालये, तसेच प्रशासकीय नियंत्रणाखालील संबंधित शासकीय उपक्रम, महामंडळे, औद्योगिक संस्था, महापालिका, जिल्हा परिषदा,

शामुमु-रोटा-साप्रवि-एच-852(3500-2-93) (कृ.मा.प.)

इत्यादींच्या निदर्शनास आणावेत व त्यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने त्यांना योग्य त्या सूचना देण्याबाबत ह्या विभागाच्या दिनांक 22 जानेवारी, 1991 च्या शासन परिपत्रकान्वये सर्व मंत्रालयीन विभागांना सूचना देण्यात आल्या आहेत.

शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, स्वातंत्र्य सैनिकांनी नामनिर्देशन दिल्यानंतर वर्षानुवर्षे नामनिर्देशित व्यक्तींना नोकरी मिळत नाही व ते वयाधिक झाल्यावर नोकरीला अपात्र ठरतात. तरी स्वातंत्र्य सैनिक/नामनिर्देशित व्यक्ती ह्यांच्या नोकरी विषयीची प्रकरणे नियमानुसार प्राधान्याने निकाली काढण्याच्या दृष्टीने दिनांक 22 नोव्हेंबर 1991 च्या परिपत्रकानुसार दिलेल्या सूचनांचे काटेकोर पालन व्हावे, अशी विनंती आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. तु. वाघमारे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हाधिकारी,
निवड नस्ती.